सन २०१९-२० मधील अर्थसंकल्पीत
तरतूदीचे वितरण करणेबाबत.
शेतकऱ्यांना अल्पमुदत पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी १ टक्का व्याज दराने अर्थसहाय्य (२४२५१५०१)

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ०५१९/ प्र.क्र.६०/१८-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३१ ऑक्टोबर, २०१९

**वाचा :-**

१. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक सीसीआर १४०६/ प्र.क्र.२४७/२-स, दिनांक १७/०५/२००६
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा-प्रशा ५, दिनांक १०/०५/२०१६
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०१/०४/२०१९
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०८/०७/२०१९
५. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक संकीर्ण ०५१९/ प्र.क्र.६०/१८-स, दिनांक ३०/०७/२०१९

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक १ अन्वये राज्य शासनाने राज्यातील शेतकऱ्यांना ६% व्याज दराने अल्प मुदत पीक कर्ज पुरवठा होण्यासाठी शासकीय अर्थसहाय्याचा निर्णय घेतलेला आहे. या निर्णयानुसार, केंद्र शासनाचे धोरणानुसार बँका ज्या ठिकाणी शेतकऱ्यांना ७% व्याज दराने कर्ज पुरवठा करणार आहेत, त्या ठिकाणी बँकांनी ७% ऐवजी शेतकऱ्यांना ६% व्याज दराने कर्ज पुरवठा करावा, असे राज्य शासनाचे धोरण आहे. या प्रयोजनासाठी १% व्याज फरकाच्या रक्कमेचा आर्थिक भार शासनावर आहे. सन २००६-०७ पासून खरीप व रब्बी हंगामामध्ये राज्यातील जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका, राष्ट्रीयकृत बँका आणि प्रादेशिक ग्रामीण बँका व सन २०१३-१४ पासून शेतकऱ्यांना रूपये ३.०० लाखापर्यंत अल्प मुदत पीक कर्ज वाटप करणाऱ्या खाजगी बँकांना या निर्णयाचा लाभ देण्यात येत आहे.

सन २०१९-२० या चालू आर्थिक वर्षासाठी शेतकऱ्यांना अल्प मुदत पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी १ टक्का दराने अर्थसहाय्य योजनेअंतर्गत निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शेतकऱ्यांना अल्प मुदत पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी १ टक्का दराने अर्थसहाय्य योजनेअंतर्गत (२४२५ १५०१) सन २०१९-२० वर्षात अर्थसंकल्पीत रू.८०००.०० लाख तरतूदीपैकी रू.२५४३.३४ लाख एवढ्या निधीचे वितरण करून खर्च करण्यास संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक-५ अन्वये मान्यता देण्यात आली होती. आता रू.११३१.९२ लाख (रूपये अकरा कोटी एकतीस लाख ब्याण्णव हजार फक्त) निधीचे वितरण करून खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०८/०७/२०१९ अन्वये अर्थसंकल्पीत तरतूदीच्या ६०% निधी वितरीत करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

**३.** वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित बँका / संस्थांस वितरीत करताना आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रकमेबाबत उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करून घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य कार्यालयाने वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्र. ४ येथील शासन परिपत्रकामधील सूचनांचे पालन करावे.

५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा-प्रशा ५, दिनांक १०/०५/२०१६ अन्वयेच्या परिच्छेद "अ" नुसार या प्रकरणीची माहिती खालीलप्रमाणे आहे :-

*(१)* **विभागास प्रदान वित्तीय अधिकार** :- वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०८/०७/२०१९ अन्वये अर्थसंकल्पीत तरतूदीच्या ६०% वितरीत करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

*(२)* **मंजूर निधी** :- या योजनेच्या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी रूपये ८०००.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत झालेला आहे.

*(३)* मागील ३ महिन्यापूर्वी रू.२५४३.३४ लाख निधी वाटप करण्यात आला आहे. यास्तव दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे.

*(४)* **ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षांतर्गत १ वर्षापासूनचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. :- या योजनेखाली देयकांची संक्षिप्त देयके पारीत होत नाहीत.**

*(५)* **स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे :- लागू नाही.**

**(६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे :- या योजनेअंतर्गत बँका लाभार्थी आहेत.**

**(७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात करावा. :- लागू नाही.**

**(८) खरेदीविषयक प्रक्रिया अद्ययावत संबंधित शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा :- लागू नाही.**

**(९) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी :- लागू नाही.**

६. सदर तरतूद संबंधित संस्थांना अदा करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त अप्पर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करून हा खर्च किती वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच याबाबतचा अहवाल व विकास मंडळनिहाय खर्चाची माहिती वेळो वेळी शासनास पाठवावी.

७. मागणी क्र.व्ही - २ मुख्यलेखाशिर्ष " २४२५ सहकार - (१०७), सहकारी पत संस्थांना सहाय्य (०१) (१०) - शेतकऱ्यांना अल्पमुदती पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी १% व्याज दराने अर्थसहाय्य. (कार्यक्रम) (दत्तमत) (२४२५१५०१) ३३ अर्थसहाय्य ", या लेखाशिर्षाखालील सन २०१९-२० या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून सदर रक्कम खर्च करण्यात यावी.

८. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१९/ प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०८/०७/२०१९ अन्वये प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१०३११५१७०४८३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ramesh
Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2019.10.31 15:20:44 +05'30'

**( रमेश शिंगटे )**

अवर सचिव तथा सहनिबंधक सहकारी संस्था

**प्रत माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित :-**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२. महालेखाकार, महाराष्ट्र- १, मुंबई.
३. महालेखाकार, महाराष्ट्र- २, नागपूर.
४. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि., मुंबई.
५. कार्यकारी संचालक, सर्व सबंधित व्यापारी बँका.(सहकार आयुक्त, पुणे यांच्यामार्फत)
६. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.
७. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
८. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प -१३, मंत्रालय, मुंबई
९. अवर सचिव (कार्या १७ स), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. कोषागार अधिकारी, पुणे.
११. निवड नस्ती-१८-स.